**वसई विरार-शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर अतिरिक्त आयुक्त या संवर्गातील एक पद नव्याने निर्माण करण्याबाबत.**

---

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग,

शासन निर्णय क्रमांकः- वविम-१९१०/प्र.क्र.४१०/नवि-२३

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ३ फेब्रुवारी , २०११.

संदर्भ : आयुक्त, वसई विरार-शहर महानगरपालिका यांच्या दिनांक २२.९.२०१० चे पत्र व त्यासोबतचा महानगरपालिकेचा ठराव क्र. ११, दिनांक २०.९.२०१०.

**<u>प्रस्तावना :</u>**

वसई-विरार शहर महानगरपालिकेच्या भौगोलिक क्षेत्रातील वाढती लोकसंख्या व त्याअनुषंगाने करावयाची विकास कामे, नियोजन प्राधिकरण म्हणून महानगरपालिकेस नुकतीच मिळालेली जबाबदारी, सॅटेलाईट टाऊन म्हणून वसई विरार शहर महानगरपालिका क्षेत्राचा विकास करण्याचा निर्णय तसेच केंद्र सरकार व राज्य सरकार पुरस्कृत विविध विकासाच्या कल्याणकारी योजनांची कामे ही सर्व कर्तव्ये पार पाडण्याकामी आयुक्तांना मदत करण्याच्या दृष्टीने अतिरिक्त आयुक्त या संवर्गातील एक नविन पद निर्माण करण्यास व सदर पदासाठी येणारा खर्च वसई-विरार शहर महानगरपालिका निधीतून करण्याबाबतचा ठराव क्र. ११, दिनांक २०.९.२०१० अन्वये महासभेने पारित केला आहे. त्यानुषंगाने आयुक्त, वसई-विरार शहर महानगरपालिका यांनी वसई-विरार शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर "अतिरिक्त आयुक्त" या संवर्गातील एक पद नव्याने निर्माण करण्याचा प्रस्ताव दिनांक २२.९.२०१० अन्वये शासनास मान्यतेसाठी सादर केला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

आयुक्त, वसई-विरार शहर महानगरपालिका यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील वस्तुस्थिती विचारात घेऊन वसई-विरार शहर महानगरपालिकेसाठी "अतिरिक्त आयुक्त" संवर्गातील एक पद नव्याने निर्माण करण्यास व सदर पदासाठी येणारा खर्च महानगरपालिका निधीतून करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ५१ (४) मधील तरतूदी अन्वये राज्य शासनास असलेल्या प्राप्त अधिकाराचा वापर करुन शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर "अतिरिक्त आयुक्त" हे पद, राज्य शासनामार्फत वर्ग -१ श्रेणीतील शासकीय अधिकाऱ्यांतून भरण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्रभाकर पवार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे, सचिव
२) विभागीय आयुक्त, कोंकण विभाग, नवी मुंबई
३) आयुक्त, वसई-विरार शहर महानगरपालिका विरार, जि. ठाणे
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
५) नगर सचिव, वसई-विरार शहर महानगरपालिका विरार, जि. ठाणे
६) अवर सचिव (नवि-१४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
७) निवड नस्ती (नवि-२३).
७ संगणक कक्ष, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.